**सहायक वनसंरक्षक (कॅम्पा व वन्यजीव) परतवाडा हे पद उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम यांचे कार्यालयाकडे वर्ग करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.३०/फ-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३० जून, २०१७

वाचा :- १) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.एसएलएफ-२०१०/ प्र.क्र.७०/जल.-१२, दि.२६/०७/२०१०.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), म.रा. नागपूर यांचे पत्र क्र.मवसे/ प्र.क्र.१३/१५-१६/२६००/कक्ष-९, दि.१५/१२/२०१६.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, संदर्भ क्र.१ दि.२६/०७/२०१० अन्वये नंदूरबार, हिंगोली, गोंदिया व वाशिम या ४ जिल्ह्यांसाठी उपसंचालक, सामाजिक वनीरकण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत केले आहे. राज्यातील सामाजिक वनीकरणाच्या ३३ विभागापैंकी वाशिम विभाग सोडून इतर विभागात सहायक संचालकांची पदे मंजूर करण्यात आली आहेत. केवळ वाशिम विभागासाठी सहायक संचालकांचे पद मंजूर करण्यात आलेले नाही. उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम यांचेकडे मग्रारोहयो, नरेगा, जैवविविधता इत्यादी कामे मोठया प्रमाणात सुरु आहेत. यास्तव सहायक वनसंरक्षक (कॅम्पा व वन्यजीव) परतवाडा हे पद उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम यांचे कार्यालयाकडे वर्ग करण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२, दि.१५/१२/२०१६ च्या पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. त्यास अनुसरुन सहा. वनसंरक्षक (कॅम्पा व वन्यजीव) परतवाडा जिल्हा अमरावती हे पद उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम यांचे कार्यालयाकडे वर्ग करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम यांचेकडे मग्रारोहयो, नरेगा, जैवविविधता इत्यादी कामे मोठया प्रमाणात सुरु आहेत, त्यांचे कार्यालयाकडे सहायक संचालक संवर्गातील एका पदाची आवश्यकता आहे. यास्तव सहायक वनसंरक्षक (कॅम्पा व वन्यजीव) परतवाडा, जिल्हा अमरावती हे पद उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम यांचे कार्यालयाकडे वर्ग करण्यात येत आहे.

सदरहू पद उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम यांचे कार्यालयाकडे वर्ग केल्यानंतर या पदाचे पदनाम सहायक वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, वाशिम असे राहील. तसेच सदर पदाचे मुख्यालय वाशिम येथे राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१७०६३०१८४४२७८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Atul Ashok Kode
Date: 2017.06.30 18:41:30 +05'30'

(अ.अ. कोदे)
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यावस्थापन ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) महाराष्ट्र राज्य,नागपूर
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग) महाराष्ट्र राज्य, नागपूर
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संशोधन,शिक्षण प्रशिक्षण), पुणे
८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती
१०) सर्व मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक / उपवनसरंक्षक
११) उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वाशिम
१२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/ वाशिम
१३) वन विभागातील सर्व कार्यासने.
१४) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१५) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१६) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).